सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता इको टास्क फोर्स बटालियन स्थापन करणे (कार्यक्रम) (२४०६ A२११) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सावनि-२०२२/प्र.क्र.३५/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक:-३१ मार्च, २०२३**

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं/२०२२-प्र.क.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२

२) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. ४४/१४६/२०२२-२३, दि. १५.०६.२०२२.

३) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. ४४/२१८/२०२२-२३, दि. १९.०७.२०२२.

४) शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.३५/फ-११, दि. २२.०७.२०२२

५) शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.३५/फ-११, दि. ०६.१०.२०२२

६) शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.३५/फ-११, दि. १७.११.२०२२.

७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं.क.प्र/२०२२-४३/अर्थ-३, दि.०८.०२.२०२३

८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं.क.प्र/२०२२-४३/अर्थ-३, दि.१६.०३.२०२३.

प्रस्तावना: -

सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षाकरिता इको टास्क फोर्स बटालियन स्थापन करणे (कार्यक्रम) (२४०६ A२११) या योजनेकरीता ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रु.१६९१.९९लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. सदर योजनेकरीता वित्त विभागाने रु.११८४.३९ लक्ष इतक्या रकमेचे सुधारित अंदाज निश्चित केले आहेत.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र. २ व ३ येथील नमूद प्रस्तावानुषंगाने सन २०२२-२३ वर्षात इको टास्क फोर्स बटालियन स्थापन करणे (कार्यक्रम) (२४०६ A२११) या योजनेकरीता ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत संदर्भाधीन क्रमांक ४, ५ व ६ येथे नमूद शासन निर्णयान्ववये रु.७१०.६३ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर योजनेकरीता ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उर्वरित रू.४७३.७६ लक्ष निधी (रु. चार कोटी त्र्याहत्तर लक्ष शहात्तर हजार मात्र) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या “इको टास्क फोर्स बटालियन स्थापन करणे (कार्यक्रम) (२४०६ A२११)” योजनेकरिता ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रू.१६९१.९९ लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता. त्यापैकी ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उर्वरित **<u>रू.४७३.७६ लक्ष निधी (रु. चार कोटी त्र्याहत्तर लक्ष शहात्तर हजार मात्र) वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.</u>**

०२. सदर निधी सुधारित अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ८ येथील दिनांक १६.०३.२०२३ रोजीच्या परिपत्रातील अटीच्या अधीनतेने वितरीत व खर्च करण्याची दक्षता घेण्याबाबत नियंत्रक अधिकारी यांनी संबंधितांना निर्देश द्यावेत.

०३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

०४. प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर हे वर्ष २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरित केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

०५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १, ७ व ८ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०७. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन (राज्य) योजनांतर्गत योजना**
**११० वन्य जीव संरक्षण**
**इको टास्क फोर्स बटालियन स्थापन करणे (कार्यक्रम) (००)(२६) (२४०६ A२११)**
**५०- इतर खर्च**

०९. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३ व दिनांक १६.०३.२०२३ रोजीचे परिपत्रक, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/ २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१०६/१४७५, दिनांक २४.०३.२०२३ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१६६/व्यय-१०, दिनांक २९.०३.२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३१११११६४२१८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d7999 9ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B7155 7BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.31 20:51:36 +05'30'

**(विनायक बा. इंगळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य ,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसरंक्षक ( प्रादेशिक ), औरंगाबाद.
४. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.
७. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
८. वित्त विभाग, व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन अधिकारी, फ- १, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती फ-११